आदिवासी विभागात लहान उपसा
जलसिंचन योजनेचे काम हाती
घेण्याबाबत आदिवासी लाभार्थ्यांचा सहभाग

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन परिपत्रक क्र. ओसीओ १०९६/१५४९/२८/९६/का.२१
मंत्रालय विस्तार,मुंबई- ३२
दिनांक :- १६ मे, १९९६

**वाचा :-** १) शासन परिपत्रक आदिवासी विकास विभाग क्र. पाबंवि १६९०/प्र.क्र ८६/का.९ दिनांक ६.४.१९९३.

२) आदिवासी विकास विभाग पत्र क्र. टिएसपी १०९५/प्र.क्र १०४/९५/का .६ दिनांक ३.४.१९९६ व त्यासोबतचे मंत्रीमंडळ आदिवासी उपयोजन नियोजन समितीच्या दिनांक १५.१.१९९६ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

**शासन परिपत्रक :-** प्रस्तावनेतील अ.क्र १ येथे नमूद केलेल्या शासन परिपत्रकान्वये आदिवासी भागात लहान उपसा सिंचन योजना घ्यावयाची असल्यास किमान आदिवासी लाभार्थी ९०% असावेत असा दंडक घालण्यात आला होता. परंतु या योजनांसाठी ९०% आदिवासी लाभार्थी उपलब्ध होत नसल्यामुळे आदिवासी उपयोजनेतून मंजूर केलेला निधी पुर्णपणे खर्च होवू शकत नाही. त्यामुळे अशा योजनांमध्ये ९०% लाभार्थ्यांची अट शिथिल करुन ५०% पर्यंत आणण्याबाबत मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळाच्या आदिवासी उपयोजना नियोजन उपसमितीच्या दिनांक १५.१.१९९६ रोजी झालेल्या बैठकीत सविस्तर चर्चा झाली व सदर बैठकीत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने याबाबत शासनाने आता असा निर्णय घेतला आहे कि, ज्या उपसा जलसिंचन योजनांमध्ये ९०% पेक्षा कमी आदिवासी लाभार्थी उपलब्ध होतात त्याप्रकरणी आदिवासी लाभार्थ्यांची टक्केवारी ५० टक्क्यापर्यंत सरसकट न आणता ती टप्प्याटप्प्याने ( म्हणजेच ८०%, ७०%, ६०% ) ६०% पर्यंत आणण्यात यावी व त्यानुसार आदिवासी उपयोजनेतून निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. तसेच अशा उपसा जलसिंचन योजनेच्या संदर्भात आस्थापना खर्च (सेंटेंज चार्जेस ) वगळण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही /-
( सु. ग. बने )
उप सचिव